आदिवासी क्षेत्रात चांगले, होतकरू व कार्यक्षम अधिकारी नेमणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक एसआरव्ही-१०९०/प्र.क्र. ११/९०/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ७ जानेवारी १९९१.

पहा:- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सकसांकाक्रीवप-टिएसई-१०८३/प्र.क्र.६५१/का.१४[१], दिनांक ४ एप्रिल १९८३.

प रि प त्र क

आदिवासी भागातील कार्यालयामध्ये उत्साही, तरूण व कार्यक्षम अशा कर्मचा-यांची नेमणूक करण्यात यावी. कर्मचा-यांना शिक्षा देण्यासाठी या भागात नेमले जावू नये. तसेच निरूत्साही, अनुत्सुक किंवा सेवानिवृत्ती जवळ आलेले कर्मचारी या भागात नेमल्यास त्याचा आदिवासी क्षेत्रातील कामावर वाईट परिणाम होतो व शासनाचे ध्येय पूर्ण होणे अवघड जाते, म्हणून या सर्व गोष्टींचा काळजीपूर्वक विचार करून आदिवासी भागात चांगला कर्मचारी वर्ग नेमला जाईल याबाबत कृपया दक्षता घ्यावी, असे उपरोक्त दिनांक ४ एप्रिल १९८३ च्या परिपत्रकान्वये सर्व संबंधितांना कळविण्यात आले होते. तथापि शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, आदिवासी भागात अधिका-यांच्या नियुक्त्या करताना त्या तेथील गरजेनुसार केल्या जात नाहीत. या उलट अनेकदा ज्या अधिका-यांच्या दुसरीकडे नियुक्त्या करता येत नाहीत अशांची अल्प कालावधीकरिता शिक्षा म्हणून आदिवासी भागात नियुक्ती केली जाते. याचा आदिवासी भागातील प्रशासनावर विपरित परिणाम होतो.

२. आदिवासी भागातील सध्याचे बिकट प्रश्न लक्षात घेता आदिवासी व डोंगराळ भागात नियुक्त करण्यात येणारे अधिकारी हे धडाडीचे व चांगल्या दर्जाचे असले पाहिजेत, अशी शासनाची इच्छा आहे. शासनाची अशीही इच्छा आहे की, जे अधिकारी चांगले काम करू शकतील असे अधिकारी आदिवासी भागात नियुक्त करावेत व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी भागातील नियुक्ती ही शिक्षा म्हणून असू नये. आदिवासी भागातील सेवा ही त्या व्यक्तीच्या प्रशासकीय कारकीर्दीतील दुर्गम प्रदेशाचे व कठीण परिस्थितीचे प्रशासन करण्याची क्षमता व गुणवत्ता याची मान्यताच समजली जावी अशी भावना प्रत्येक विभागात दृढ होईल याकडे संबंधित नियुक्ती अधिका-यांनी लक्ष पुरवावे.

३. शासनाचे असेही आदेश आहेत की, सर्व मंत्रालयीन विभागांनी तसेच विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांनी वरील मार्गदर्शक तत्वे लक्षात ठेवून त्यांची परिणामकारकरित्या अंमलबजावणी होत आहे याची खात्री करून घ्यावी व त्याबाबतचा आढावा घेऊन त्यासंबंधीचा अहवाल दरवर्षी जुलै महिन्यात आदिवासी विकास विभागाकडे पाठवावा.

४. बदली करण्यात सक्षम असलेल्या प्राधिका-यांनी शासकीय सेवकांची बदली

करण्यापूर्वी त्यांना वैयक्तिक पसंतीची तीन चार ठिकाणे कळविण्याची संधी द्यावी व नियतकालिक बदल्यासंबंधी निर्णय घेताना शासकीय सेवकांनी कळविलेली पसंती व प्रशासकीय सोय या दोन्ही बाबी विचारात घेऊन बदल्यासंबंधी निर्णय घ्यावेत, अशा स्वरूपाचे आदेश शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०८५/सीआर-३०/१२, दिनांक १६ जुलै १९८५ अन्वये काढण्यात आलेले आहेत. अशा परिस्थितीत शासकीय सेवकाने आदिवासी क्षेत्रात किमान ५ वर्षे चांगली सेवा केल्यानंतर त्याच्या पसंतीच्या ठिकाणी बदली मागितली तर त्या सेवकास अग्रहक्काने पसंतीच्या ठिकाणी नेमणूक देण्याबाबत सक्षम प्राधिका-यांनी जरूर विचार करावा. मात्र नंतरच्या बदलीच्या प्रसंगी त्या शासकीय सेवकाच्या पसंतीप्रमाणे पुन: बदली द्यावी, असे कायम सूत्र अवलंबिण्यात येऊ नये.

५. जे अधिकारी उपरोक्त आदेशांची योग्य व आवश्यक ती अंमलबजावणी करणार नाहीत, त्या अधिका-यांविरूद्ध योग्य ती कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

एच. ए. डी. सावियन,
प्रधान सचिव [सेवा],
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
सचिव, आदिवासी विकास विभाग,
शासनाचे सर्व सचिव,
मंत्रालयीन सर्व विभाग [प्रत्येकी दहा प्रती],
सचिव, अनुसूचित जमाती कल्याण समिती, विधान भवन, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर,
जिल्हाधिकारी व आदिवासी उप आयुक्त [सर्व आदिवासी जिल्हे],
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आदिवासी उप आयुक्त, [सर्व आदिवासी जिल्हे],
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, जुने जकात घर, डी.डी. बिल्डिंग, फोर्ट, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक,
कृषि संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, फलोद्यान, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे,

एच-११०८[१,२००-१-९१]-१३

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक,
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, नगर योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, सेवायोजन, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
उद्योग आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सह निबंधक, सहकारी संस्था, आदिवासी विकास, नाशिक,
दुग्धशाळा विकास आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सह संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
ग्रामविकास विभाग [का. १५], मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे/नाशिक/पुणे/अमरावती/ अहमदनगर/चंद्रपूर/नागपूर,
अधीक्षक अभियंता, प्रकल्प मंडळ, नाशिक/नागपूर,
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे मंडळ, ठाणे/नाशिक/अकोला/नांदेड/वर्धा/चंद्रपूर/ पुणे/अहमदनगर,
अधीक्षक अभियंता, एन. के. आय. प्रकल्प मंडळ, ठाणे,
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प, चंद्रपूर,
अधीक्षक अभियंता, भातसा पाटबंधारे प्रकल्प, ठाणे,
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प, नागपूर,
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प, नाशिक,
आदिवासी विकास आयुक्त व सचिव, नाशिक,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प,
x सचिव, विमुक्त जाती व भटक्या जमाती कल्याण समिती, विधान भवन, मुंबई,
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

---

x पत्राने.

एच-११०८[१,२००-१-९१]-३